# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३०६/१८२१/प्र.क्र.४९/नवि-७
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ ऑक्टोबर, २००६

**शासन निर्णय :**

सोबत जोडलेल्या अधिसूचना व उद्घोषणा (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात भाग-१ अ उप विभाग यामध्ये दिनांक १९ ऑक्टोबर, २००६ रोजी प्रसिध्द करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श्याम वर्धने)
महाराष्ट्र शासनाचे सह सचिव

सहपत्र - वरीलप्रमाणे

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई (पत्राने)
प्रधान सचिव-१ (नगर विकास), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
प्रधान सचिव-२ (नगर विकास), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय मुंबई - ४०० ०३२.
प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई, मुंबई खंडपीठ नागपूर, औरंगाबाद आणि गोवा.
व्यवस्थापकीय संचालक, सिडको, निर्मल भवन, मुंबई.
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई - ५१, यांनी प्रमुख ३ वृत्तपत्रामध्ये अधिसूचनेबाबत जाहिरात द्यावी.
विभागीय आयुक्त, कोकण भवन, नवी मुंबई.
जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई जिल्हा.
अधिक्षक, सर्व जिल्हा सत्र न्यायालये.
महासंचालक, प्रसिध्दी संचालनालय, महाराष्ट्र (प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसह)
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, चर्नी रोड प्रेस, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, वरील शासन निर्णयानुसार अधिसूचना व उद्घोषणा राजपत्रात प्रसिध्द करुन त्याच्या ४०० प्रती प्रत्येकी इंग्रजी व मराठीमध्ये या विभागाकडे तात्काळ पाठविण्यात याव्यात.

सर्व सहसचिव/उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग.
नगर विकास विभागातील सर्व कक्ष अधिकारी/निवडनस्ती नवि-७.
संगणक शाखा, वेब साईटवर देण्यासाठी.
निवड नस्ती, नवि-७.

# अधिसूचना

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ ऑक्टोबर, २००६

ट्रामवेज अधिनियम, १८८६.

क्र.एमआरडी-३३०६/१८२१/प्र.क्र.४९/नवि-७ : ट्रामवेज अधिनियम, १८८६ (१८८६ चा अधिनियम ११), महाराष्ट्र राज्यास लागू असतांना, याच्या कलम ४ द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा अणि त्याबाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करुन, महाराष्ट्र शासनाने जे नियम करण्याचे योजिले आहे, त्या पुढील मसुदा, त्याद्वारे बाधा पोचण्याचा संभव असलेल्या सर्व व्यक्तींच्या माहितीसाठी उक्त अधिनियमाच्या कलम ६, पोटकलम (१) द्वारे आवश्यक असल्याप्रमाणे, याद्वारे प्रसिध्द करण्यात येत आहे आणि याद्वारे अशी नोटीस देण्यात येते की, उक्त मसुदा दिनांक २० नोव्हेंबर,२००६ रोजी किंवा त्यानंतर महाराष्ट्र शासनाकडून विचारात घेण्यात येईल.

२. उपरोक्त दिनांकापूर्वी उक्त मसुद्याच्या संबंधात कोणत्याही व्यक्तीकडून ज्या कोणत्याही सूचना किंवा आक्षेप प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, यांच्याकडे येतील त्यावर शासन विचार करील.

## आदेशाचा मसुदा

क्र.एमआरडी-३३०६/१८२१/प्र.क्र.४९/नवि-७ : ज्याअर्थी, बृहन्मुंबईतील सार्वजनिक जलद वाहतूक व्यवस्थेमध्ये सुधारणा घडवून आणण्याच्या उद्देशाने विविध पर्यायी सार्वजनिक जलद वाहतूक प्रकल्पाची शक्यता पडताळून पाहण्याच्यादृष्टीने, विविध प्रकारे अभ्यास करण्यात आला आहे.

आणि ज्याअर्थी, मुंबईतील सार्वजनिक वाहतूक व्यवस्थेमध्ये सुधारणा घडवून आणण्याकरीता वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर या छन्नमार्गास अग्रक्रम देण्यात आला आहे;

आणि ज्याअर्थी, सार्वजनिक-नि-खाजगी सहभागाने, बांधा, मालकी स्विकारा, वापरा आणि हस्तांतरीत करा (BOOT) या तत्वावर उक्त छत्रमार्गाचा विकास करणे इष्ट आहे. याकरीता शासनाने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास प्रकल्प अंमलबजावणी संस्था म्हणून घोषित केले आहे.

आणि ज्याअर्थी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, १९७४ (१९७५ चा महा. चार) याच्या कलम ३ खाली स्थापन करण्यात आलेल्या मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने (मुं.म.प्र.वि.प्रा.) उक्त छत्रमार्गावर ट्रामवे/मास रॅपीड ट्रान्झीट सिस्टीम (एमआरटीएस)च्या बांधकामासाठी अर्ज केला आहे.

आणि ज्याअर्थी, उक्त प्रयोजनासाठी उक्त छत्रमार्गावरील ट्रामवे/मास रॅपीड ट्रान्झीट सिस्टीम (एमआरटीएस)च्या बांधकामास प्राधिकृत करणारा आदेश काढणे इष्ट आहे;

त्याअर्थी, आता, ट्रामवेज अधिनियम, १८८६ (१८८६ चा अधिनियम ११), महाराष्ट्र राज्यास लागू असतांना, त्याच्या कलम ४, पोटकलम (१) खंड (क) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्याबाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासन याद्वारे, उक्त छत्रमार्गावरील ट्रामवे/मास रॅपीड ट्रान्झीट सिस्टीम (एमआरटीएस)चे बांधकाम, प्रचालन आणि देखभाल करण्यासाठी खाली दिलेल्या अनुसूचीत विनिर्दिष्ट केलेल्या शर्तीवर उक्त मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण किंवा त्यांनी स्थापन केलेली कंपनी किंवा प्राधिकरणाने ज्या विकासकाबरोबर करार केला असेल असा विकासक, यांना त्यासाठी प्राधिकृत करीत आहे.

<u>अनुसूची</u>

I. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन उपक्रमाची व्याप्ती :

(१) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन हे, रेल्वे मार्गाबरोबरच (मग तो मार्ग रस्त्यावरुन, जमिनीवरुन, बांधलेल्या उंचवटयावरुन जाणारा असो

किंवा जमिनीखालून (बोगदयातून) जाणारा असो) मेट्रो वाहतूक सेवेच्या उभारणीसाठी आणि मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा व तिच्याशी संबंधित अन्य कोणतेही बांधकाम यांच्या प्रवर्तनासाठी जबाबदार असेल. त्या प्रयोजनार्थ, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा उपक्रम पुढील सर्व किंवा त्यांपैकी कोणतीही कामे हाती घेईल :

(क) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेने आखलेला मार्ग व त्याच्याशी संबंधित अन्य सर्व बांधकामे व सोयी यांच्या मार्गात येणारी कोणतीही जमीन, कालवे, नद्या, मार्ग किंवा रस्ते यांच्यामध्ये, त्यांच्यावर, त्यांच्यामधून किंवा त्यांच्यावरुन आवश्यक असतील तितके लोहमार्ग बांधणे;

(ख) अशी घरे, वखारी, कार्यालये व इतर इमारती आणि अशी आवारे, स्टेशने, इंजिने, यंत्रसामग्री, उपकरणे आणि इतर बांधकामे व सोयी उभारणे व बांधणे;

(ग) उपरोक्तप्रमाणे अशा इमारती, बांधकामे व सोयी यांमध्ये फेरबदल दुरुस्त्या करणे किंवा त्या बंद करणे आणि त्यांच्याजागी दुसऱ्या बांधणे;

(घ) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा किंवा तिचा कोणताही भाग यांचे बांधकाम किंवा परिरक्षण करण्यासाठी मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेने आखलेल्या मार्गावर किंवा आंतरशाखीय टप्प्यांवर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने रस्ते किंवा मार्ग खुले करणे, तातपुरते वळवणे, बंद करणे किंवा तोडणे;

(ङ) सक्षम प्राधिकाऱ्याचे समाधान होईल, अशा रीतीने मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेने रेखांकित केलेल्या मार्गाची किंवा रस्त्याची देखभाल व दुरुस्ती करणे;

(च) कोणतीही पर्जन्य जलवाहिनी, अधोभूमी जलवाहिनीसाठी खणलेले चर (किंवा तशाच स्वरुपाच्या वाहिन्या किंवा तत्सम

घटक) नाली (मलप्रणालीसहित), ओहळ, जलप्रवाह किंवा ओढे, मोऱ्या किंवा इतर कोणतीही साधने (मग ती सांडपाणी वाहून नेणारे, मलनिस्सारणासाठी वापरात आणण्यात येणारे, घाणीचे पाणी, प्रदुषित पाणी, कारखान्यांमधून उत्सर्जित होणारे पाणी असो किंवा अन्य कोणत्याही गोष्टींसाठी वापरलेले असो) खुली किंवा उघडी ठेवणे, त्यांचे प्रवाहमार्ग बदलणे किंवा त्यात फेरफार करणे, ते वळवणे किंवा ते तात्पुरते बंद करणे;

(छ) कोणतीही जमीन, इमारत, रस्ता, रेल्वे किंवा जलप्रवाह यांच्यावर त्यांच्याखालून किंवा त्यांच्यावरुन कोणतीही तार, विद्युत, गॅस पुरवठा, तारयंत्र किंवा दूरध्वनी मार्ग नेण्यासाठी त्यात फेरफार करणे, ते वळवणे किंवा ते तात्पुरते बंद ठेवणे किंवा त्यांची संच मांडणी करणे किंवा त्यांच्या निर्गम मार्गाची पातळी वाढवणे किंवा कमी करणे;

(ज) कोणत्याही नद्या, कालवे, ओहळ, ओढे किंवा जलप्रवाह यांच्यावर किंवा त्यांच्याखाली बोगदे, मार्ग, किंवा इतर बांधकाम करण्यासाठी कोणत्याही नद्या, कालवे, ओहळ, ओढे किंवा जलप्रवाह यांचे प्रवाह तात्पुरते किंवा कायमचे वळवणे किंवा त्यात फेरबदल करणे;

(झ) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा मार्गाकडून किंवा मार्गाकडे पाणी वाहून नेण्याच्या प्रयोजनार्थ, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा मार्गालगतच्या कोणत्याही जमिनींमध्ये, जमिनींमधून किंवा जमिनीखाली गटारे किंवा प्रणाल तयार करणे;

(ज) संकेतन व इतर बांधकामे करण्यासाठी कोणत्याही जमिनी, इमारती, मार्ग, रस्ते, रेल्वेमार्ग किंवा ट्राममार्ग किंवा कोणत्याही नद्या, कालवे, ओहळ, झरे किंवा इतर जलाशय

किंवा कोणतीही निस्सारणे, पाण्याचे नळ, विद्युत मार्ग व तारमार्ग, यांच्यामध्ये यांच्यावर, यांच्यामधून किंवा त्यांच्यावरुन योग्य वाटतील असे तात्पुरते किंवा कायमचे उतार, सपाट जागा, कमानी, बोगदे, नाले, बंधारे, सेतुप्रणाल, पूल, मार्ग किंवा मार्गिका यांचे बांधकाम करणे;

(ट) नकाशे व आराखडे तयार करणे व सर्वेक्षणे करणे व चाचण्या घेणे;

(ठ) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेचे बांधकाम व परिरक्षण करण्यासाठी करण्यात आलेल्या खोदकामातून साचलेल्या ढिगाऱ्याचा वापर कसा करता येईल, हे ठरविणे;

(ड) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा सुरळीतपणे चालावी यासाठी आवश्यक किंवा त्यादृष्टीने उपयुक्त होईल, अशा रेल्वे ओलांडणीच्या जागा, रेल्वे जाण्या - येण्यासाठीच्या जागा, गाडी बाजूला उभी करण्यासाठीची जंक्शन व अन्य बांधकामे यासाठीची वेळोवेळी तरतूद करणे;

(ढ) भूसंपादन अधिनियम, १८९४, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, १९७४ व महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील तरतुदीनुसार प्रकरण परत्वे मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रकल्पासाठी जमीन संपादित करणे;

(ण) राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेने, या प्रकल्पासाठी संपादित करण्यात आलेली अतिरिक्त जमीन विकणे किंवा अन्यथा विल्हेवाट करणे;

(त) लोकांच्या सुरक्षेसाठी आणि सोयीसाठी (राज्य शासनास) आवश्यक व योग्य वाटतील अशा सुधारणा स्विकारणे व त्या लागू करणे; आणि भविष्यात रस्त्यामध्ये किंवा रस्त्यांमध्ये होणाऱ्या फेरफारांना योग्य ठरतील अशा रीतीने मेट्रो रेल्वे

वाहतूक सेवेचे स्थान किंवा पातळी (स्तर) यात फेरफार करणे;

(२) वरील कोणतीही कामे, प्रत्यक्षपणे किंवा विशेष प्रयोजनार्थ स्पेशल पर्पझ व्हेईकल (SPV) यासह अन्य कोणत्याही संबंधित व्यक्तीमार्फत करण्यासाठी मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनास करार करण्यासाठीचे अधिकार आणि (जमीन) भाडेपट्ट्याने देण्याचे आणि त्यासाठी आवश्यक असलेले सर्व संलेख निष्पादित करण्याचे आणि पूर्वोक्त कोणत्याही अधिकारांचा वापर करण्याच्या दृष्टिने, आवश्यक किंवा इष्ट असतील अशा इतर सर्व गोष्टी करण्याचे अधिकार असतील.

(३) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन, उपरिनामित कामे सद्‌भावनापूर्वक व प्रयोज्य कायदे, पर्यावरणविषयक विनियम व राज्य शासनाने ट्रामवेज अधिनियमांतर्गत वेळोवेळी दिलेले निदेश, याअनुसार हाती घेईल.

(४) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनास, रेल्वेमार्ग व रचना, स्थानके, रुळयान, कर्षणपध्दती व विद्युत पुरवठा, सिग्नल व्यवस्था व दळणवळण, तिकीट व्यवस्था यांच्या दर्जेदार सेवेसह बांधकाम, कार्यचालन, व परिरक्षण आणि अशा स्वरुपाची अन्य कोणतीही मानके यांसारख्या संपूर्ण रचना पध्दतीच्या विशेष बाबी निश्चित करण्याचा व तांत्रिक परिमाणे ठरविण्याचा संपूर्ण अधिकार असेल. भविष्यात रुंदावत जाणाऱ्या मार्गिकेकरिता करण्यात आलेल्या पर्याप्त तरतुदी या, प्रवासी वाहतूक योजनेनुसार प्रवाशांच्या वाहतुकीसाठीचे सार्वजनिक अतिशीघ्र प्रवासासाठीची व्यवस्था या दृष्टीने सुरक्षित, किफायतशीर, आरामदायी, जलद व पर्यावरणास अनुकूल असल्याबाबतची खातरजमा करुन सर्व मानके किंवा परिमाणे निश्चित केली पाहिजेत.

**II. अधिकार मर्यादा :**

(१) शंका निवारणार्थ, नियामक स्वरुपाच्या सर्व कृतींसाठी बृहन्मुंबई महानगरपालिका जबाबदार असणे चालू राहील आणि मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनाकडे विनिर्देशपूर्वक सोपविण्यात न आलेल्या सर्व कामांसाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेशी समन्वय साधण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करण्यात येईल. इतर गोष्टींबरोबरच मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेने आखलेल्या मार्गाच्या अगदी निकट नलिका विहिरी खणणे किंवा विहिरी खोदणे आणि मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेने आखलेल्या मार्गाच्या आसपासच्या विनिर्दिष्ट मार्गिकेच्या आत असणाऱ्या मालमत्तेचा विकास करणे, यासाठीचे विनियमही तयार करण्यात येतील.

(२) या परिच्छेदातील पोटकलम (१) खाली कोणत्याही अधिकारांचा वापर करतांना, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन शक्य तेथवर कमीत कमी नुकसान होऊ शकेल या दृष्टीने आवश्यक ठरतील, अशा सावधगिरीच्या उपाययोजना करील; आणि असे अधिकार वापरण्याच्या परिणामी कोणत्याही व्यक्तीला झालेले नुकसान किंवा त्याला प्रत्यक्षपणे मोजावी लागलेली किंवा भरावी लागलेली किंमत केवळ, यासाठीच पात्र ठरविण्यात येईल.

**III. मेट्रो रेल्वे वाहतुक सेवामार्गाचा विकास :**

मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा मार्गाच्या बाजूने किंवा त्यावर असलेल्या कोणत्याही जमिनीच्या किंवा इमारतीच्या विकासाचा प्रस्ताव मांडणारी कोणतीही व्यक्ती, कोणतीही मान्यता किंवा संमती मिळविण्यासाठी, अशा विकासाला प्रारंभ करण्यापूर्वी आणि इतर कोणत्याही अधिनियमाखालील, तिच्या आबंधनावर कोणत्याही रीतीने मर्यादा न आणता मेट्रो रेल्वे परिवहन सेवा प्रशासनाला प्रस्तावित विकासाचा तपशिल सादर करील, आणि त्याच्याबाबतीत मेट्रो रेल्वे

परिवहन सेवा प्रशासनाकडून लादण्यात आलेल्या कोणत्याही शर्तींचे पालन करील. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन, या आदेशान्वये शर्ती लादताना, मेट्रो रेल्वे परिवहन सेवेची सुरक्षितता आणि विहित करण्यात येतील अशा बाबी विचारात घेईल.

**IV. इमारतींच्या बांधकामास आणि उत्खननास मनाई करण्याचा किंवा त्याचे विनियमन करण्याचा अधिकार :**

(१) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा उभारण्याचे काम सुलभ करण्यासाठी किंवा मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेच्या सुरक्षिततेची खात्री करुन घेण्यासाठी तसे करणे आवश्यक किंवा इष्ट आहे, असे राज्य शासनाचे मत झाले असेल तर, त्यास राजपत्रातील अधिसूचनेद्वारे,

(क) असे निदेश देता येतील की, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेच्या मार्गावर किंवा त्या अधिसूचनेत विनिर्दिष्ट करण्यात येईल, अशा मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा मार्गाच्या मध्य रेषेपासून कोणत्याही बाजूस, पन्नास मीटरपेक्षा अधिक नाही, एवढ्या अंतराच्या आत असलेल्या कोणत्याही जमिनीवर त्या अधिसूचनेत विनिर्दिष्ट करण्यात येईल, असे इमारतीचे बांधकाम किंवा असे कोणतेही विकासकाम करण्यात येणार नाही आणि अशा जमिनीवर कोणतीही इमारत असेल त्याबाबतीत असेही निदेश देता येतील की, अधिसूचनेत विनिर्दिष्ट करण्यात येईल, अशा मुदतीत अशी इमारत पाडून टाकण्यासाठी किंवा त्या अधिसूचनेत विनिर्दिष्ट करण्यांत येईल, अशा इमारतीत वाढ करण्यासाठी किंवा त्यात बदल करण्यासाठी किंवा असा कोणताही विकास करण्यापासून थांबविण्यासाठी, अशा इमारतीच्या मालकास, किंवा तिच्यावर नियंत्रण असलेल्या व्यक्तीस निदेश देता येतील.

(ख) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेच्या मार्गावर स्थित असलेल्या कोणत्याही इमारतीतील किंवा अशा मार्गाच्या मध्य रेषेपासून कोणत्याही बाजूस पन्नास मीटरपेक्षा अधिक नाही, इतक्या अंतराच्या आत असलेल्या कोणत्याही क्षेत्रातील व्यक्तींच्या अभिरक्षेत, नियंत्रणात, किंवा कब्जात असेल, अशी कोणतीही जंगम मालमत्ता किंवा प्राणी यांसह अशा सर्व व्यक्तींना, अधिसूचनेत विनिर्दिष्ट करण्यात येईल, अशा कालावधीच्या आत, त्या इमारतीतून किंवा क्षेत्रातून तात्पुरते निघुन जाण्याचे निदेश देता येतील.

परंतु, या खंडान्वये कोणतीही अधिसूचना निर्गमित करण्यापूर्वी, राज्य शासन, त्याच्यामते, अशा व्यक्तींसाठी योग्य असेल अशा तात्पुरत्या पर्यायी निवासव्यवस्थेची, मोफत, किंवा त्याच्यामते, तात्पुरती पर्यायी निवासव्यवस्था प्राप्त करण्यास पुरेशी असेल, अशी रक्कम घेऊन, तजवीज करील.

(२) या परिच्छेदामधील पोटकलम (१) च्या खंड (ख) च्या परंतुकान्वये कोणत्याही पर्यायी निवासव्यवस्थेची तजवीज करण्यासाठी कोणत्याही मालमत्तेची गरज असेल किंवा गरज भासण्याची शक्यता असेल त्याबाबतीत, भूसंपादन अधिनियम, १८९४, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, १९७४ व महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ मधील तरतुदनीनुसार सार्वजनिक प्रयोजनासाठी, अशा कोणत्याही मालमत्तेची गरज असल्याचे समजण्यात येईल आणि सक्षम प्राधिकारी, उक्त अधिनियमाच्या तरतुदींनुसार त्या मालमत्तेचे अधिग्रहण करील, आणि प्रकरण परत्वे मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रकल्पासाठी जमीन संपादित करेल;

(३) पोटकलम (१) च्या खंड (क) अन्वये अंतर विनिर्दिष्ट करताना, राज्य शासन पुढील बाबी विचारात घेईल, -

(क) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेचे स्वरुप व आवश्यकता,

(ख) इमारतीची सुरक्षितता,

(ग) विहित करण्यात येतील अशा अन्य बाबी.

(४) अधिसूचनेत विनिर्दिष्ट केलेली अशी इमारत किंवा बांधकाम पाडून टाकण्यासाठी किंवा अशा इमारतीत वाढ अथवा बदल करण्यासाठी किंवा कोणताही विकास करण्यापासून थांबविण्यासाठी अशा कोणत्याही इमारतीच्या मालकास किंवा तिच्यावर नियंत्रण असलेल्या कोणत्याही व्यक्तीस निदेश देणारी कोणतीही अधिसूचना या परिच्छेदातील पोटकलम (१) अन्वये निर्गमित करण्यात आली असेल त्याबाबतीत असे निदेश अंतर्भूत असलेल्या अधिसूचनेची एक प्रत, अशा इमारतीच्या किंवा बांधकाम मालकावर, किंवा यथास्थिति, तिच्यावर नियंत्रण असलेल्या व्यक्तींवर बजावण्यात येईल.

मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन, इमारतीच्या किंवा बांधकामाच्या तलाधार बलनाचे काम किंवा अन्यथा तिला मजबूत करण्याचे काम हाती घेण्यापूर्वी, अशा इमारतीच्या किंवा बांधकाम मालकाला किंवा भोगवटादाराला किमान दहा दिवसांची लेखी नोटीस देईल.

४. **प्रवेश, इत्यादीचा अधिकार :**

मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा उभारण्याच्या किंवा त्याच्याशी संबंधीत असलेले कोणतेही बाहेरील काम करण्याच्या प्रयोजनार्थ, कोणत्याही जमिनीची किंवा इमारतीची पाहणी करण्याच्या अथवा तिच्या स्वरुपाची किंवा स्थितीची खात्री करण्याच्या हेतूने, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा, प्रशासनास किंवा त्या प्रशासनाने प्राधिकृत केलेल्या कोणत्याही व्यक्तीस, दिवसा कोणत्याही वाजवी वेळी आणि

अशा जमिनीच्या किंवा इमारतीच्या मालकाला किंवा भोगवटादाराला वाजवी नोटीस दिल्यानंतर, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा, मार्गात त्याच्या बाजूस, त्याच्यावर किंवा जवळ असलेल्या अशा जमिनीवर किंवा इमारतीवर किंवा तिच्यामध्ये पुढील गोष्टींसाठी प्रवेश करता येईल -

क. तिची तपासणी करणे,

ख. तिचे मोजमाप करणे, रेखाचित्र तयार करणे, छायाचित्र घेणे आणि मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा मार्गाच्या जवळपास चाचणी खड्डे खोदून किंवा अन्यरीतीने, कोणत्याही इमारतीच्या पायाची तपासणी करणे,

ग. उक्त प्रशासनास आवश्यक व योग्य वाटेल असे अन्य उपाय योजणे.

**VI. नुकसान, हानी किंवा क्षती याबद्दल रक्कम देय असणे :**

क) मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन, या अधिनियमाद्धारे किंवा त्याअन्वये त्यास प्रदान करण्यात आलेल्या कोणत्याही अधिकारांचा वापर करील आणि त्याच्या परिणामी, कोणतीही जमीन, इमारत, रस्ता, मार्ग किंवा मार्गिका यात हितसंबंध असलेल्या कोणत्याही व्यक्तीस कोणतेही नुकसान, हानी किंवा क्षती झाली असेल त्याबाबतीत मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन, असे नुकसान, हानी किंवा क्षती बद्दल अशा व्यक्तीला सक्षम प्राधिकाऱ्याकडून निर्धारित करण्यात येईल अशी रक्कम देण्यास पात्र असेल,

ख) या परिच्छेदाच्या पोटकलम (क) अन्वये सक्षम प्राधिकाऱ्याने निर्धारित केलेली रक्कम दोन्हीपैकी कोणत्याही पक्षकारास स्विकार्य नसेल तर, अशी देय रक्कम (दोन्हीपैकी कोणत्याही पक्षकाराने, सक्षम प्राधिकाऱ्याच्या आदेशाच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत) या प्रयोजनाकरीता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, १९७४ मधील तरतुदींअंतर्गत नियुक्त करण्यात येणाऱ्या

न्यायाधिकरणाकडे अपील दाखल करता येईल व याबाबतीत न्यायाधिकरणाने दिलेला निर्णय अंतिम असेल व दोन्ही पक्षकारांवर बंधनकारक असेल.

ग) सक्षम प्राधिकारी किंवा न्यायाधिकरण या परिच्छेदातील पोट कलम (क) किंवा (यथास्थिती) पोट कलम (ख) अन्वये रक्कम निर्धारित करतांना, जमीन, इमारत, रस्ता, मार्ग किंवा मार्गिका यात हितसंबंध असलेल्या कोणत्याही व्यक्तीस पुढील कोणत्याही कारणांमुळे झालेले नुकसान, हानी किंवा क्षती याकडे योग्य लक्ष देईल, -

एक) झाडे किंवा उभी पिके, असल्यास दूर करणे,

दोन) जमीन, इमारत, रस्ता, मार्ग किंवा मार्गिका यांचे तात्पुरते विच्छेद करणे,

तीन) इतर कोणत्याही मालमत्तेला मग ती जंगम किंवा स्थावर असो, झालेली कोणतीही क्षती.

## VII. नुकसान भरपाईसाठी दावा करण्याचा अधिकार :

ज्या क्षेत्रात नुकसान, हानी किंवा क्षती पोहोचली असेल त्या क्षेत्रातील मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा उभारण्याचे काम किंवा इतर काम पूर्ण झाल्याच्या तारखेपासून बारा महिन्यांच्या कालावधीच्या आत या अधिनियमान्वये मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा उभारण्याच्या किंवा त्याच्याशी संबंधीत इतर कोणत्याही कामाच्या परिणामी झालेले कोणतेही नुकसान, हानी किंवा क्षती यासंबंधात दावा केला नसेल तर, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा विरुध्द असा कोणताही दावा करण्यात येणार नाही.

**VIII. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनाने किंवा सवलतधारकाने पथकर/भाडे वसूल करणे :**

क. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनास किंवा सवलतधारकास, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेच्या संबंधात, शासनाची पूर्व मंजूरी घेऊन, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनाने किंवा सवलतधारकाने वेळोवेळी विनिर्दिष्ट केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक नसेल इतक्या प्रमाणात पथकराची मागणी करता येईल किंवा तो घेता येईल.

ख. वसूल करावयाच्या सर्व प्राधिकृत पथकरांची/भाडयाची एक सूची, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासन निदेश देईल अशा भाषेत, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा स्थानकांवर ठळक जागी प्रदर्शित करण्यात येईल.

ग. राज्य शासनास, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेचे भाडे निश्चित करण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला (एमएमआरडीएला) प्राधिकृत करता येईल आणि आवश्यकतेनुसार वेळोवेळी त्यात सुधारणा करता येईल.

**IX. संकीर्ण :**

१. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनाने कामावर लावलेल्या स्पेशल पर्पज व्हेईकल (एस.पी.व्ही.) यंत्रणेच्या कसुरीमुळे/निष्काळजीपणामुळे मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा नेमून दिलेल्या तारखेपर्यंत कार्यादिष्ट झाली नसेल तर, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनास, तो प्रकल्प परत घेण्याचा अधिकार असेल आणि ते, सवलत कराराच्या शर्तीनुसार असेल अशा कोणत्याही दाव्यांच्या अंमलबजावणीच्या अधीन, कोणत्याही खाजगी प्रवर्तकाद्वारे केलेली कोणतीही समन्यायी गुंतवणुकीची परतफेड करण्यासाठी, यंत्रणेने स्पेशल पर्पज व्हेईकल (SPV) घेतलेल्या कोणत्याही कर्जाची परतफेड करण्यास पात्र असेल.

२. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवेचे प्रवर्तन व परिरक्षण करण्याचे काम, अधिनियमानुसार किंवा राज्य शासनाच्या आदेशाद्वारे किंवा सवलत कराराच्या

शर्तीनुसार पट्टयाने दिलेले असेल किंवा त्यासाठी लायसन दिलेले असेल.

३. या आदेशाच्या अटी व शर्ती, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा, प्रशासनाकडे अर्ज केल्यावर, त्या अर्जावरील पुढील आदेशाद्वारे रद्द करता येतील, त्यात सुधारणा करता येईल, वाढ करता येईल किंवा त्यात बदल करता येईल (राज्य शासनास). आपल्या स्वेच्छा निर्णयानुसार तो अर्ज मंजूर करता येईल किंवा फेटाळता येईल. तो, अर्ज मंजूर केल्यास, अर्जात मागणी केलेले हक्क, अधिकार व प्राधिकार यातील कोणतीही भर, किंवा फेरफार किंवा त्याच्या संबंधातील निर्बंध किंवा अट, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनाच्या लेखी संमतीशिवाय आणखी आदेशाद्वारे घालण्यात किंवा लादण्यात येणार नाही, याखेरीज आदेश, ज्या रीतीने दिलेला असेल त्याच रीतीने आणखी एक आदेश देईल.

४. मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा मार्गाच्या बाजूने अधिकारिता असलेली अशी सर्व प्राधिकरणे, प्रकल्पाच्या सुरळीत अंमलबजावणीसाठी वेळोवेळी गरज भासेल त्याप्रमाणे, मेट्रो रेल्वे वाहतूक सेवा प्रशासनाला आवश्यक ती सर्व मदत देतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(signature)

प्रधान सचिव(१)
महाराष्ट्र शासन.

## NOTIFICATION

Urban Development Department,
Mantralaya, Mumbai - 400 032.
Date : 19 October, 2006.

**Tramways Act, 1886.**

No.MRD-3306/1821/CR-49/UD-7 - The following draft of Order which the Government of Maharashtra proposes to issue in exercise of the powers conferred by section 4 of the Tramways Act, 1886 (Act 11 of 1886) in its application to the State of Maharashtra; and of all other powers enabling it in that behalf, is, as required by sub-section (1) of section 6 of the said Act, hereby published for information of all persons likely to be affected thereby and notice is hereby given that the said draft will be considered by the Government of Maharashtra on or after 20th November, 2006.

2. Any objection or suggestion which may be received by the Principal Secretary, (I), Urban Development Department, Mantralaya, Mumbai - 400 032, before the aforesaid date will be considered by the Government.

## DRAFT ORDER

No.MRD-3306/1821/CR-49/UD-7 - Whereas, with a view to explore the possibility of providing various alternate Mass Rapid Transit System (MRTS), in order to improve the traffic and transportation scenario in Brihan Mumbai, various studies have been carried out;

And whereas, the Versova-Andheri-Ghatkopar MRTS Corridor has been identified as priority corridor to improve such traffic and transport;

And whereas, it is expedient to develop the said corridor by Public Private Participation (PPP) on Build, Own, Operate and Transfer (BOOT) basis. For this purpose Mumbai Metropolitan Region Development Authority (MMRDA) has been designated as Project

Implementing Agency (PIA).

And whereas, the MMRDA established under section 3 of the Mumbai Metropolitan Region Development Authority Act, 1974 (Mah. IV of 1975) has applied for construction of a tramway/MRTS in the said corridor;

And whereas, for the said purpose it is expedient to issue an Order authorising construction of a tramway/MRTS in the said Corridor;

Now, therefore, in exercise of the powers conferred by clause (a) of sub-section (1) of section 4 of the Tramways Act, 1886 (Act 11 of 1886) in its application to the State of Maharashtra; and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby authorises, the construction and maintenance of a tramway/MRTS in the said Corridor by the said Mumbai Metropolitan Region Development Authority or any company established by it or any developer with which that Authority may enter into an agreement, on the conditions specified in the Schedule ~~appended hereto~~ given below.

## SCHEDULE

**I. Scope of Activities of the MRTS Administration**

(1) The MRTS Administration shall be responsible for construction of the MRTS inter-alia of the rail lines, (whether on the road, ground, elevated or underground) and superstructure required for the operation of the MRTS or any other work connected therewith. For this purpose, the MRTS Administration may undertake all or any of the following activities:

a) construct such number of rail tracks as may be necessary upon, under, along or over any land, canal, river, street or road on the MRTS alignment and all other works and conveniences in connection therewith;

b) erect or construct such houses, warehouses, offices and other buildings and such yards, stations, engines, machinery, apparatus and other works and conveniences;

c) alter, repair or discontinue such buildings, works and conveniences as aforesaid and substitute others in their stead;

d) open, temporarily divert, close or break up roads or streets on the alignment or at intersection points with the prior consent of the Competent Authority, for the purposes of the construction or maintenance of the MRTS or any part thereof.

e) Maintain and repair the portion of the road or street traversed by the MRTS to the satisfaction of the Competent Authority.

f) Open, alter, divert or temporarily close any rain water pipe, sub-soil water pipe (or other pipes or objects of a like nature), trench, drain (including a sewer), channel, ditch, culvert or any other device (whether for carrying of sullage, sewage, offensive matter, polluted water, trade effluent, or any other object).

g) Alter, divert or temporarily close any cable, electric, gas supply, tele-communication or telegraph lines or installations, or raise or sink level thereof in order to carry them over, under, or across any land, building, street, road, railway or water body;

h) Alter the course of any rivers, canals, brooks streams or water-courses for the purpose of constructing tunnels, passages or other works over or under them and divert or alter temporarily or permanently, the course of any rivers, canals, brooks, streams, or water-courses.

i) Make drains or conduits into, through or under, any lands adjoining the MRTS for the purpose of conveying water from or to the MRTS.

j) To lay down signaling and other works; make or construct in, upon, across, under any lands, buildings, streets, road railways or tramways or any rivers, canals, brooks, streams or other waters or any drains, water-pipes, electric lines of telegraph lines, such temporary or permanent inclines, planes, arches, tunnels, culverts, embankments, aqueducts, bridges, ways or passages;

k) Draw maps, make plans or conduct surveys or tests;

l) Determine the application of material excavated for the construction or maintenance of the MRTS;

m) Make provision for such crossings, passing places, sidings, junctions and other works, as may from time to time be necessary or convenient to the efficient working of the MRTS;

n) Acquire land for the MRTS project under Land Acquisition Act 1894 or MMRDA Act 1974 or MR & TP Act 1966 as the case may be.

o) Sell or otherwise dispose of any surplus land acquired for this Project, with the prior approval of the State Government;

p) Adopt and apply such improvements as the(State Government) may consider necessary or desirable for the safety or convenience of the public, and to alter the position or level of the MRTS to suit future alterations in the road or roads

(2) The MRTS Administration shall, for the purpose of doing any of the above activities either directly or through any other party including the Special Purpose Vehicle (SPV) have the power to enter into contracts and leases and to execute all instruments necessary therefore and to do all other things necessary or expedient for the exercise of any of the aforesaid powers.

(3) The MRTS Administration shall undertake the above named activities in good faith, and in accordance with applicable laws, environmental regulations and any directions that the State Government may give from time to time under provisions of Tramways Act.

(4) The MRTS Administration will have the complete authority to decide the technical parameters and the performance specifications of the entire system viz, way and track structure, stations, rolling stock, traction system and power supply, signaling and communication, ticketing, method of construction, operation and maintenance including quality of service and any other such system parameters. All the parameters should be so fixed as to ensure safe, economical,

comfortable, fast and eco-friendly mass rapid transit system for the public carriage of passengers as per the rider-ship projections for the corridor with adequate provisions for the future growth.

II. **Limitations of Powers :**

(1) For the avoidance of doubt, the MCGM shall continue to be responsible for all acts of a regulatory nature and the MRTS Administration shall coordinate closely with the MCGM for all activities that have not specifically been delegated. Including inter-alia framing of regulations for drilling of tube wells or sinking of wells, in the proximate vicinity of the MRTS alignment; and development of property within the corridor specified around the MRTS Alignment.

(2) While exercising any powers under sub-section (1), the MRTS Administration shall take such precautionary measures as are necessary, shall cause as little damage as possible and shall be liable only for the damage or cost actually suffered or incurred by any person as a result of the exercise of such powers.

III. **Development over MRTS Alignment:**

Any person who proposes to develop any land or building along or on the MRTS alignment shall, before commencing such development and without in any way limiting his obligation under any other Act to obtain any approval or consent, submit to the MRTS Administration details of the proposed development and shall comply with any conditions imposed by the MRTS Administration in respect thereof.

The MRTS Administration shall while imposing any condition under this Order have regard to the safety of the MRTS and such other matters as may be prescribed.

IV. **Power to prohibit or regulate construction of buildings and excavation:**

(1) If the State Government is of opinion that it is necessary or expedient so to do for facilitating the construction of the MRTS or for ensuring the safety of the MRTS, it may, by notification in the Official Gazette,

(a) direct that no building or any such development as may be specified in the notification shall be constructed or made above the MRTS alignment or on any land within such distance, not exceeding fifty meters on either side of the centre line of the MRTS alignment, as may be specified in the notification and where there is any building on such land also direct the owner of, or the person having control over, such building to demolish such building or to make such additions or alterations to such building as may be specified in the notification or to desist from making any such development and within such period as may be specified in the notification.

(b) Direct temporary evacuation of all persons together with any movable property or animal that may be in custody, control or possession of such persons from any building situated above the MRTS alignment or in any area within a distance not exceeding fifty meters on either side of centre line of such alignment and within such period as may be specified in the notification:

Provided that before issuing any notification under this clause, the State Government shall provide such persons temporarily with alternative accommodation, which in its opinion is suitable, free of cost, or an amount, which in its opinion is sufficient to procure a temporary alternative accommodation.

(2) Where any property is needed or likely to be needed for providing any alternative accommodation under the proviso to clause (b) of sub-section (1) of this para IV, such property shall be deemed to be needed for a public purpose under LA Act 1894 or MMRDA Act 1974 or MR&TP Act, 1966 as the case may be.

(3) In specifying the distance under clause (a) of sub-section (1) of this para IV, the State Government shall have regard to –

a) the nature and the requirement of the MRTS;

b) the safety of the building;

c) such other matters as may be prescribed.

(4) Where any notification has been issued under sub-section (1) of this para IV of directing the owner or the person having control over any building/structure to demolish such building or to make additions or alterations to such building or to desist from making any development specified in such notification a copy of the notification containing such direction shall be served on the owner of, or the person having control over such building/structure, as the case may be,

(5) The MRTS administration shall give to the owner or occupier of such building/structure at least 10 days notice in writing before undertaking the work of underpinning or otherwise strengthening the building/structure.

V. **Power to enter, etc. –**

With a view to making survey, or to ascertaining the nature or condition, of any land or building for the purpose of construction of MRTS or any outer work connected therewith, the MRTS Administration or any person authorized by that administration may, at any reasonable hour in the day time and after giving reasonable notice to the owner or occupier of such land or building, enter upon or into such land or building in, along, over or near or near the MRTS alignment to –

a. inspect the same;

b. make measurements and drawings and take photographs thereof and check up, by digging trial pits or otherwise, the foundation of any building in the vicinity of the MRTS alignment'

c. take such other measures as the said administration deems necessary and proper.

VI. **Amount payable for damage, loss or injury:**

a) Where the MRTS Administration exercises any power conferred on it by or under this Act and in consequence thereof any damage loss or injury is sustained by any person interested in any land, building, street, road or passage, the MRTS Administration shall be liable to pay

to such person for such damage, loss or injury such amount as may be determined by the Competent Authority.

b) If the amount determined by the Competent Authority under sub-section (a) of this para VI is not acceptable to either of the parties, an appeal will be preferred by either of the parties within thirty days from the date of order of Competent Authority to the Tribunal appointed for the purpose under MMRDA Act, 1974. On appeal, the Tribunal, after hearing, shall determine the amount to be paid and its determination shall be final and shall be binding on both the parties.

c) The Competent Authority or the Tribunal while determining the amount under sub-section (a) or sub-section (b) of this para VI, as the case may be, shall have due regard to the damage, loss or injury sustained by any person interested in the land, building, street, road or passage by reasons of –

   (i) the removal of trees or standing crops, if any;

   (ii) the temporary severance of the land, building street, road or passage;

   (iii) any injury to any other property whether movable or immovable.

**VII. Right to claim for damages:**

No claim in respect of any damage, loss or injury alleged to have been caused as a consequence of construction of MRTS or any other work connected therewith under this Act shall be against the MRTS Administration unless such claim is made

within a period of twelve months from the date of completion of the construction of MRTS or other work in the area in which such damage, loss or injury is caused.

VIII. **Tolls/Fares leviable by MRTS Administration or concessionaire**

a. The MRTS Administration or concessionaire may demand and take in respect of the MRTS, tolls not exceeding the limits specified from time to time by the MRTS Administration or concessionaire with the previous sanction of the Government,

b. A list of all the tolls/fares authorized to be levied shall be exhibited in such languages as MRTS Administration may direct, in conspicuous places at the MRTS stations.

c. The State Government may authorize MMRDA to fix the fares for the MRTS and revise the same from time to time as necessary.

IX. **Miscellaneous:**

1. In the event that the MRTS is not commissioned by the scheduled date, due to the default/negligence of the SPV appointed by the MRTS Administration, the MRTS Administration shall have the right to resume the project and shall be liable to repay any debt taken by the SPV to repay any equity investment put in by any private promoter, subject to any claims administration may have in accordance with the terms of the Concession Agreement

2. The operation and maintenance of the MRTS may be leased or licensed in accordance with the Act or by order of the State Government or terms of the Concession Agreement

3. The terms and conditions of this order may on the application of MRTS Administration, be revoked, amended, extended or varied by a further order upon application. The (State Government) may, in its discretion, either grant or reject the application. If it grants the application, it shall make the further order in the same manner as an order, except that no addition to, or modification of, the rights, powers and authorities asked for in the application, or restriction or condition with respect thereto, shall be made or imposed by the further order without the consent in writing of the MRTS Administration.

4. All such authorities having jurisdiction along the MRTS corridor shall extend all the necessary help to the MRTS Administration for the smooth implementation of the project, as needed from time to time

By order and in the name of the Governor of Maharashtra,

[signature]

Principal Secretary (1)
Government of Maharashtra.